राज्य उत्पादन शुल्क विभागातील ४६ निर्लेखीत केलेल्या वाहनांच्या बदल्यात ४६ नवीन वाहने खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- वाहन-१४१५/प्र.क्र.१७०/राउशु-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २१ जानेवारी, २०१७.

**वाचा** : १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.डीएसपी-१०९१/प्र.क्र.४/विनियम, दि.१८.०६.१९९१.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.३१/२००१/विनियम, दि.१५.०६.२००१.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दि.४.०८.२०१४.
४) शासन निर्णय क्र.वाहन-२०१२/प्र.क्र.४१/राउशु-१,दि.७.०२.२०१५
५) शासन निर्णय, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.३०.१०.२०१५
६) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.वाहन-१४१५/प्र.क्र.१७०/राउशु-१, दि.३१.०८.२०१६.

**शासन ज्ञापन** :-

संदर्भाधीन दि.७.०२.२०१५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे, राज्य उत्पादन शुल्क विभागातील वाहनांचा आढावा घेऊन विभागासाठी एकूण २७० वाहने अनुज्ञेय ठरविण्यात आली आहेत. त्यापैकी निर्लेखित केलेल्या ४६ वाहनांच्या बदल्यात नवीन वाहने खरेदी करण्यास व त्यासाठी प्रति वाहन रु.६.०० लाखाच्या मर्यादेत येणाऱ्या अंदाजे रु. २,७६,००,०००/- (रुपये दोन कोटी शह्यात्तर लाख फक्त) इतक्या खर्चास संदर्भाधीन दि.३१.०८.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच त्यासाठी विधानमंडळाच्या जुलै, २०१६ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये रू.२.७६ कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला आहे.

२. आता, सदरची संपूर्ण तरतूद (रू.२.७६ कोटी) बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेली असून, सदर रू.२.७६ कोटी इतकी रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) वित्त विभाग परिपत्रक क्र.मुविनि-१०१६/प्र.क्र.६/१६/विनियम, दि.४ मार्च, २०१६ मधील सुचनेनुसार दि.३१.०३.२०१५ यापूर्वीचे तपशिलवार देयक प्रलंबित नाही.
(२) दि.३१.०३.२०१५ नंतर संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व तपशिलवार देयकांचा तत्परतेने निपटारा करण्यात येईल.
(३) या संक्षिप्त देयकांचे तपशीलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.
(४) खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.
(५) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहीत मुदतीत सादर करण्याची व्यक्तिगत जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.
(६) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरिता निधी उपलब्ध आहे.

३. सदर वाहने खरेदी करताना वित्त विभागाने दि.४.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेली प्रति वाहन रु. ६.०० लाख किंमत मर्यादा पाळण्यात यावी तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने संदर्भाधीन दि.३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या खरेदी धोरणातील तरतुदी विचारात घेऊन सदर वाहन खरेदी करण्याची कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी करावी.

४. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांना कळविण्यात येते की, निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी केल्यानंतर, दोन महिन्यांच्या आत निर्लेखित वाहनांची विक्री करणे बंधनकारक राहील. निर्लेखित वाहनांच्या विक्रीबाबत, वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१८.०६.१९९१ व दि.१५.०६.२००१ तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेश/परिपत्रक/निर्णय यांचे पालन करून, निर्लेखित वाहनांची लिलावाने विक्री करून, विक्रीने जमा झालेली रक्कम शासकीय कोषागारात जमा करावी. तसेच यापुढे नवीन वाहनांची खरेदी करण्याचे प्रस्ताव शासनाकडे सादर करताना यापूर्वी निर्लेखित वाहनांपैकी किती वाहनांची विक्री करण्यात आली व त्यातून किती निधी प्राप्त झाला याबाबत सविस्तर माहिती द्यावी अन्यथा नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावांना मान्यता प्रदान करण्यात येणार नाही.

५. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष- २०३९ **राज्य उत्पादन शुल्क**, (००) ००१, **संचालन व प्रशासन**, (०१)- **आयुक्तांचे कार्यालय**, (०१)(०१)- **आयुक्त कार्यालय- आस्थापना (दत्तमत** २०३९ ००१४), १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुत ज्ञापन, वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.६००/विनियम, दि.२७.१२.२०१६ आणि अनौपचारीक संदर्भ क्र.२/विनियम, दि.२.०१.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०१२१११३३२६६०२९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip J Shedmekhe

Digitally signed by Dilip J Shedmekhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, serialNumber=5603a72ffdb1ef7b928b7c0a641bd1c8ef4b36aa6a8fd21a86271888a24f9803, cn=Dilip J Shedmekhe
Date: 2017.01.21 11:36:07 +05'30'

**(दि. ज. शेडमेखे)**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क विभाग,
३. सर्व जिल्हा अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क विभाग
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग (विनयम/व्यय-८/अर्थसंकल्प-११ शाखा), मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (राउशु-१)